**श्री. सुधाकर व्ही. यार्लगड्डा, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर व श्री. मकरंद एस. देशपांडे, जिल्हा न्यायाधीश-२ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, पालघर या दोन न्यायिक अधिका-यांना कॉमनवेल्थ ज्युडिशियल एज्युकेशन इन्स्टिट्यूट, कॅनडा येथे Intensive Study Program for Judicial Educators या कार्यक्रमामध्ये सहभागी होण्यास तसेच सदर दौ-याकरीता रु.३५ लक्ष इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१०२२/प्र.क्र.४८/का.९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ०३ मे, २०२३.

**संदर्भ**- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. परदौ-१४२०/प्र.क्र.२६/११ दि.०१.०२.२०२१.
२) विधि व न्याय विभाग शासन आदेश समक्रमांक, दि.२५.०५.२०२२.
३) प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. F&B/१४th/१८५/२०२२-२३, दि.१७.०३.२०२३.
४) प्रबंधक (विधि व संशोधन), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. JOTI/२११६/३७८/२०२२-२३, दि.१३.०४.२०२३.
५) प्रबंधक (विधि व संशोधन), उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. JOTI/२११६/४४५/२०२२-२३, दि.२९.०४.२०२३.

**प्रस्तावना :**

कॉमनवेल्थ ज्युडिशियल एज्युकेशन इन्स्टिट्यूट(CJEI), हॅलिफॅक्स, कॅनडा येथे दि.०४ जून २०२३ ते दि.२३ जून २०२३ या कालावधीत "28th Annual Intensive Study Program for Judicial Educators" हा कार्यक्रम आयोजित करण्यात येणार आहे. कॉमनवेल्थ ज्युडिशियल एज्युकेशन इन्स्टिट्यूट ही एक नामांकित संस्था आहे. सदर संस्थेकडून न्यायिक शिक्षण प्रभावीरित्या देण्यासाठी विविध प्रशिक्षण कार्यक्रम हाती घेतले जातात, ज्यात विशेषत: न्यायिक शिक्षणातील विविध तंत्र व पध्दती याबाबत प्रशिक्षण दिले जाते. सदर संस्थेला यापूर्वी अनेक उच्च न्यायालयाचे न्यायाधीश व न्यायिक अकादमी मधील प्राध्यापकांसह अनेक भारतीय न्यायाधीशांनी भेट दिली आहे. त्यामुळे सदर प्रस्तावित अभ्यास दौरा हा न्यायिक शिक्षण व तांत्रिक ज्ञानवर्धनासाठी उपयुक्त ठरेल. तसेच संबंधित न्यायिक अधिका-यांचे कायदेशीर ज्ञान अद्यावत होईल व तसेच त्यांचे दैनंदिन न्यायालयीन कामाकाजात फायदेशीर ठरेल. तसेच त्याचा फायदा हा सामान्य जनतेला व पक्षकारांना व शासनाला पण उपयुक्त ठरेल. सदर बाब विचारात घेता, मा. उच्च न्यायालयाने संदर्भ क्रमांक ३, ४ व ५ येथील पत्रांन्वये, श्री. सुधाकर व्ही. यार्लगड्डा, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर व श्री. मकरंद एस. देशपांडे, जिल्हा न्यायाधीश - २ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, पालघर या दोन न्यायिक अधिका-यांना सदर दौ-यामध्ये सहभागी होण्यास तसेच सदर दौ-याकरीता येणा-या रु.३५ लक्ष इतक्या अंदाजित खर्चास मान्यता देण्याची शासनास विनंती केली आहे. संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींनुसार, सदर प्रस्तावास राज्य शासनाची मान्यता घेण्यात आली असून, दोन्ही न्यायिक अधिका-यांना केंद्र शासनाच्या विदेश मंत्रालयाकडून Political Clearance प्राप्त झाले आहे. त्यानुसार सदर दौ-यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कॉमनवेल्थ ज्युडिशियल एज्युकेशन इन्स्टिट्यूट, हॅलिफॅक्स, कॅनडा येथे दि. ४ जून २०२३ ते दि. २३ जून २०२३ या कालावधीत होणाऱ्या '28th Annual Intensive Study Program for Judicial Educators' या कार्यक्रमामध्ये खालील नमूद अधिका-यांना सहभागी होण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे:

| अ.क्र. | न्यायिक अधिका-याचे नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री. सुधाकर व्ही. यार्लगड्डा | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर |
| २ | श्री. मकरंद एस. देशपांडे | जिल्हा न्यायाधीश-२ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, पालघर |

**२.** सदर दौ-याकरीता येणा-या रु.३५,००,०००/- (अक्षरी रुपये पस्तीस लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, (०५) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था, (०५)(०१) न्यायिक अधिकारी प्रशिक्षण संस्था (अनिवार्य) (दत्तमत) (२०१४ ०२०७), १३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टाखाली वित्तीय वर्ष २०२३-२४ मधील मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

**४.** सदर दौ-याच्या अनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील सामान्य प्रशासन विभागाचे शासन परिपत्रक तसेच केंद्र शासनाकडून वेळोवेळी निर्गमित सूचना, अटी, शर्तींचे पालन करण्यात यावे.

**५.** सदर दौरा पूर्ण झाल्यानंतर तीन आठवड्यांच्या कालावधीत दौऱ्याच्या कामकाजाचा विस्तृत अहवाल शासनास सादर करण्यात यावा. तसेच, झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात यावे.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७९/व्यय-५ दि.०२.०५.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०३१९१३२२४७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDHARTHA
SAHEBRAO GHORPADE

Digitally signed by SIDDHARTHA SAHEBRAO GHORPADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=6772091c132df9bf65ea514d28bc392c7f04593129b9648f59519dd184a93538, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=8C2D3416097D6E0C4E8489E1482CD5F42C4EDB7A2B33F63A57070E0F0D4F766E, cn=SIDDHARTHA SAHEBRAO GHORPADE
Date: 2023.05.03 19:21:43 +05'30'

**( सिद्धार्थ साहेबराव घोरपडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
४. मा. मुख्य न्यायमूर्ती यांचे प्रधान सचिव, उच्च न्यायालय, मुंबई,
५. प्रबंधक (विधि व संशोधन), उच्च न्यायालय, मुंबई,
६. प्रबंधक (वित्त व अर्थसंकल्प), उच्च न्यायालय, मुंबई,
७. सहसंचालक, महाराष्ट्र न्यायिक अकादमी व भारतीय मध्यस्थी केंद्र आणि प्रशिक्षण संस्था, उत्तन, जि.ठाणे,

८. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, ठाणे,
९. श्री. सुधाकर व्ही. यार्लगड्डा, प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, अहमदनगर,
१०. श्री. मकरंद एस. देशपांडे, जिल्हा न्यायाधीश-२ व अतिरिक्त सत्र न्यायाधीश, पालघर,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)-एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४. कार्यासन अधिकारी (का.११), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. कार्यासन अधिकारी (व्यय-५/अर्थ-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. कार्यासन अधिकारी (का.२३/२४/२५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. निवडनस्ती/कार्या-९.